**राज्यमार्ग क्र. १८५ आरोदा तिठा ते किरणपाणी रस्ता कि.मी. १/१३५ ते कि.मी. १/३७५ ही २४० मी. लांबी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन.**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-टीआरएस २०१५/प्र.क्र.३००/रस्ते-१.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८/०८/२०१५

संदर्भ - १) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली विधान भवन मुंबई येथे झालेल्या दि. ३०/३/२०१५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,मुंबई यांचे पत्र क्र.मुअ(मु) /का.१(३)/मु. आ./रस्ते हस्तांतरण ११६/३७७९, दि.१३/०८/२०१५.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये मुख्य अभियंता सा.बा. प्रादशिक विभाग मुंबई यांनी सिधुंदूर्ग जिल्हयातील विषयात नमुद केलेल्या राज्यमार्ग क्र. १८५ आरोंदा तिठा ते किरणपाणी रस्त्याच्या कि.मी. १/१३५ ते कि.मी. १/३७५ मधील २४० मी. लांबी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. ३०/३/२०१५ रोजी संपन्न झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार सादर करण्यात आल्याचे नमुद करण्यात आले आहे. सदर रस्त्याची लांबी किरणपाणी येथे नवीन पुलाचे बांधकाम झाले असल्याने सद्यस्थितीत वापरात येत नसल्याचे प्रस्तावात नमुद करण्यात आले आहे. उपरोक्त रस्त्याची २४० मीटर लांबीचा भाग महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्याबाबत बोर्डाने विंनती केलेली आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती शासन या संदर्भात आता पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग, सावंतवाडी यांच्याकडे देखभाल दुरुस्तीसाठी असलेल्या खालील नमूद केलेल्या रस्त्यांची लांबी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | रस्त्याचे नांव व दर्जा | हस्तांतरीत करावयाच्या रस्त्याची लांबी साखळी क्रमांकासह | एकूण लांबी |
|---|---|---|---|
| १. | राज्यमार्ग क्र. १८५ आरोदां तिठा ते किरणपाणी रस्ता रा.मा. १८५ कि.मी. १/१३५ ते कि.मी. १/३७५ ही २४० मी. लांबी | अ) रस्ते विकास योजना सन २००१ - २०२१ नुसार कारीवडे (बुर्डी-सांवतवाडी) अरोंदा - रड्डी - किरणपाणी हा रस्ता राज्यमार्ग क्र. १८५ असा आहे. रस्त्यांची लांबी ३९.६०० कि.मी. ची आहे. रस्त्याच्या लांबीपैकी कि.मी १/१३५ ते कि.मी. १/३७५ | २४० मीटर |
| | **एकूण** | | **२४० मीटर** |

२. सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्याकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे ताब्यात घ्यावयाची लांबी खालील अटींवर वर्ग करुन घ्यावी :-

१) उपरोक्त निर्णयान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्याकडे हस्तांतर झालेल्या रस्त्याच्या देखभाल व दुरूस्तीसाठी लागणारा संपुर्ण खर्च महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने करावा.

२) सदर रस्ता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्यात आल्यानंतर रस्त्याच्या लांबीच्या वार्षिक विवरणपत्रात योग्य ते बदल करण्यात यावेत व त्याप्रमाणे परिरक्षण अनुदानास मंजुरी देण्यांत येईल.

३) हस्तांतरित करण्यात येत असलेला रस्ता ताब्यात घेतल्याचा दिनांक शासनास योग्य वेळी कळविण्यांत यावा.

४) रस्ता हस्तांतरीत करुन घेण्यापूर्वी त्यावरील अतिक्रमणे/लीज बांधकाम, कंत्राट अथवा इतर संलग्न विषयासंबंधी न्यायालयीन प्रकरणे याची योग्य पडताळणी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिकाऱ्यांनी करुन घ्यावी.

५) रस्ता हस्तांतरित केल्यानंतर त्यावरील अतिक्रमणे/लीज बांधकाम, कंत्राट अथवा इतर संलग्न विषयाची हाताळण्याची करण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिका-यांची राहील. संबंधित अधिकारी/प्राधिकारी ह्यांनी वरील विषयाबाबत कांही न्यायालयीन आदेश असल्यास त्याचा अवमान होणार नाही ह्याची दक्षता घ्यावी. सबंधित न्यायालयीन प्रकरणाची कागदपत्रे प्राप्त करून योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डच्या अधिका-यांची राहील.

६) उपरोक्त रस्त्यांसमवेत विश्रामधामे असतील व त्यांच्या हस्तांतरणाची निकड वाटत असल्यास तशा प्रकारचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

७) रस्त्याची मालकी पुर्णपणे सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील. सदर रस्ता सार्वजनिक बांधकाम विभागास आवश्यकता भासेल तेव्हा महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने सार्वजनिक बांधकाम विभागास रस्ता वाहतुकीसाठी योग्य असल्याची खात्री करुन परत करणे आवश्यक राहील.

८) सदर रस्ता सामान्य जनतेसाठी वापरण्यास कोणताही प्रतिबंध येणार नाही. याची काळजी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने घेणे आवश्यक आहे.

९) या रस्त्याच्या लांबीमध्ये शासनाच्या पथ किनारवर्ती नियंमाचे पालन करण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०८२८१२०२१२५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bhatkhande C Vishwanath

Digitally signed by Bhatkhande C Vishwanath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhatkhande C Vishwanath
Date: 2015.08.28 12:08:52 +05'30'

**(चं.वि.भातखंडे)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मुख्य अभियंता,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित,मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय ६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) महालेखापाल २, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) मुख्य अभियंता, सा. बां.प्रादेशिक विभाग,मुंबई.
८) अधिक्षक अभियंता, सा. बां. मंडळ,रत्नागिरी.
९) विभागीय आयुक्त, कोकण विभाग.
१०) जिल्ह्याधिकारी, सिंधुदूर्ग.
११) जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
१२) जिल्हा निरीक्षक, भूमी अभिलेख, सिंधुदूर्ग
१३) कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, सावंतवाडी.
१४) कार्यासन अधिकारी, कार्यासन सेवा ५/अर्थ १/नियोजन-१/
१५) प्रशासन १/रस्ते ४/रस्ते ७/मिव्य २ ,सा.बां.विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
१६) कार्यासन अधिकारी रस्ते १ (निवड नस्ती) सा.बां.विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
१७) कार्यासन अधिकारी,लेखापरिक्षा,सारसंग्रहासाठी,सा.बां.विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.